**महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान**
**नागरी पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधांचे सार्वत्रिकरण करण्यासाठी नागरी संस्थांनी करावयाच्या उपाययोजना बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक सुनिअ-२०१०/प्र.क्र. १३२/पापु-२२**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२**
**दिनांक : १९ जून, २०१०**

**संदर्भ :** १. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र. नापापु२००८/प्र.क्र.१/पापु-२२, दि.२२,ऑक्टोबर,२००८
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु२००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि. २३ डिसेंबर,२००८
३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु२००८/प्र.क्र.२००/पापु-२२, दि.१९ मार्च,२००८
४. शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.संस्वअ२००९/प्र.क्र.१९७/पापु-१६, दि.२३ फेब्रुवारी,२०१०

**प्रस्तावना :**

राज्यातील नागरी स्थानिक संस्थांच्या पाणी पुरवठा व मलनिःसारण योजनांसाठी शासनाकडून विविध कार्यक्रमांतर्गत अनुज्ञेय अनुदान देण्यात येते व याप्रमाणे राज्यातील अनेक शहरांसाठी पाणी पुरवठा योजना घेण्यात आल्या असून काही शहरांना मलनिःस्सारण योजना मंजूर करण्यात आलेल्या आहेत. या योजनांची कामे पूर्ण झाल्यावर देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी ही संबंधित नागरी स्थानिक संस्थांची असते. या योजनेची कार्यक्षम देखभाल व दुरुस्ती करुन नागरिकांना नियमित पाणी पुरवठा करणे ही महत्वाची जबाबदारी नागरी स्थानिक संस्थांचीच आहे. त्या अनुषगांने, पाणी पुरवठा योजनेची कार्यक्षम देखभाल व दुरुस्ती करणे , पाणी पुरवठयापोटी योग्य दराने पाणीपट्टी आकारणे, त्याचे बिलींग व वसुली करुन योजना भौतीक व आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण करणे अत्यंत आवश्यक असते.

२. शहरी भागात नागरीकांना सध्या पिण्याचा पाणी पुरवठा हा खाजगी नळजोडण्या, सार्वजनिक नळखांबे अथवा गट नळजोडण्या याव्दारे करण्यात येतो. शहरामध्ये दिलेल्या खाजगी नळजोडण्यांचे प्रमाण एकुण मालमत्ताच्या तुलनेत कमी असून मोठया प्रमाणावर नागरीकांना सार्वजनिक नळखांबे अथवा गट नळ जोडण्याव्दारे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन घ्यावे लागते. या संबंधात असे सुध्दा निदर्शनास आले आहे की, बहुतांश पाणी पुरवठा व्यवस्थेमध्ये अवैध नळजोडण्या किंवा टँकरद्वारे मुख्य जलवहिनी तसेच वितरणवाहिनीतून अवैधरीत्या पाणी घेण्यात

येते. अशा प्रकारामुळे पाण्याचा अपव्यय होवून शहरातील सर्व नागरीकांना पर्याप्त पाणी पुरवठा तर होत नाहीच, परंतु, त्याचबरोबर योजनेमधील जलवाहिन्या जागोजागी फोडल्यामुळे जलवाहिन्यामधून मोठया प्रमाणावर गळती होऊन नागरी स्थानिक संस्थेचे आर्थिक नुकसानही होत असते. त्याचबरोबर जागोजागी जलवहिन्यांना छिद्रे पाडल्याने सांडपाणी व मलामुळे मोठया प्रमाणावर पिण्याचे पाणी दुषित होत असल्याने आरोग्य विषयक प्रश्न निर्माण होतात.

३. नागरी भागातील वैयक्तिक व सार्वजनिक शौचालयाच्या बांधकांमासाठी राज्य शासन व केंद्र शासनाद्वारे कार्यक्रम राबविण्यात येतात. त्या व्यतिरिक्त नागरिकांद्वारे वैयक्तिक तसेच नागरी स्थानिक संस्था व सेवाभावी संस्थाकडून सुध्दा सार्वजनिक शौचालयाचे बांधकाम करण्यात येते. या अंतर्गत राज्यात असलेल्या एकुण वैयक्तिक शौचालयांची उपलब्धता लक्षात घेता राज्यातील नागरी भागात शौचालयाची व्याप्ती ही अपर्याप्त आहे. वैयक्तिक शौचालय व सार्वजनिक शौचालयांची मर्यादित उपलब्धता, नागरिकांची शौचालय बांधणे तसेच शौचालयाचा वापर करण्याबाबतची अनास्था, तसेच याबाबत नागरीकांमध्ये जागरुकता निर्माण करण्यामध्ये अपुरे प्रयत्न लक्षात घेता शौचालय बांधकाम व व्यवस्थापन यामध्ये अपेक्षित उदिष्ट साध्य होऊ शकलेले नाही. यामुळे अनेक शहरात उघडयावर शौचविधी करण्याची पध्दत अजूनही सुरु असलेली दिसते. वर नमूद केलेल्या विविध कारणांमुळे उघडयावर शौचविधीस बसण्याच्या पध्दतीमुळे नागरिकांची, विशेषतः महिलांची, कूचंबणा व वृध्द नागरिकांना सुध्दा शारिरीक त्रास सहन करावा लागतो. या प्रकारामुळे नागरीकांच्या आरोग्याचे प्रश्न तर निर्माण होतातच शिवाय, शहराची स्वच्छता व परिसराच्या निटनेटकेपणासही बाधा पोहचत असते.

४. नागरी भागातील पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्राबाबत वर नमूद केलेली परिस्थिती लक्षात घेता यावर उपाययोजना करणे अंत्यंत आवश्यक झालेले आहे. त्या अनुषंगाने, महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त शासनाने महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्याचा निर्णय घेतलेला आहे. त्या अंतर्गत नागरी पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रामध्ये तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे धोरण आखण्यात आले आहे. नागरी पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रात विविध अपेक्षित सुधारणा करणाऱ्या नागरी स्थानिक संस्थांच्या पाणी पुरवठा व मलनिःसारण योजनांसाठी वाढीव अनुदान देण्याचा निर्णयसुध्दा शासनाने संदर्भांकित दि.२२ ऑक्टोबर,२००८ च्या शासन निर्णयान्वये घेतलेला आहे. वरील परिच्छेदात नमूद केल्याप्रमाणे मर्यादित खाजगी नळ जोडण्या, सार्वजनिक नळखांबे अथवा गट नळजोडण्यांद्वारे नागरीकांना पाणीपुरवठा करण्यात येतो. तर, उर्वरित नागरिक किरकोळ विक्रेत्यांकडून पाणी घेतात, त्याचबरोबर अवैध नळजोडण्या व पाणी चोरी इ. माध्यमातून पिण्याचे पाणी प्राप्त करुन घेतात. या परिस्थितीवर मात करण्यासाठी अधिकृत घरांना खाजगी नळजोडण्या व गट नळजोडण्या देऊन सर्वांना पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देणे तर वैयक्तिक व सार्वजनिक शौचालयाचे पर्याप्त बांधकाम करणे व त्याचे कार्यक्षम

व्यवस्थापन करण्याच्या कार्यपध्दतीचे धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत सर्वंकष विचार करुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेतआहे :-

**शासन निर्णय :**

१. (अ) महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण जयंती वर्षानिमित्ताने महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत असून या अंतर्गत सर्वांना पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने नागरी स्थानिक संस्थानी त्यांच्या क्षेत्रात सर्व अधिकृत घरांना खाजगी नळजोडण्या देण्यासाठी तसेच, सध्या सार्वजनिक नळखांबे किंवा इतर माध्यमातून पाणी घेणाऱ्या नागरिकांना गट नळजोडण्या उपलब्ध करुन देण्यासाठी कालबध्द मोहिम राबवावी.

(ब) नागरी भागातील अनधिकृत नळजोडण्या शोधून त्या योग्य व्यासाच्या पाईपलाईनमधून व योग्य जागेतून घेतल्या असल्यास, त्याची शहानिशा करुन आवश्यक शुल्क आकारुन त्या नियमित करण्यासाठी नागरी स्थानिक संस्थांनी विशेष मोहिम राबवावी. अनधिकृत नळजोडण्या तांत्रिकदृष्टया वितरण व्यवस्थेत अपायकारक असल्यास त्या खंडीत करुन संबंधितांना पात्रतेनुसार नियमित नळजोडण्या देण्यात याव्यात.

२. (अ) नागरी भागातील अधिकृत घरासांठी वैयक्तिक व सार्वजनिक शौचालयाची उपलब्धता वाढविणे व विशेषतः झोपडपट्टी भागामध्ये सार्वजनिक शौचालयांचे बांधकाम व त्याचे व्यवस्थापन करण्यासाठी नागरी स्थानिक संस्थानी शहर स्वच्छता आराखडे तयार करुन त्याची अंमलबजावणी करावी.

(ब) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाद्वारे निर्मल महानगर प्रदेश अभियान राबविण्यात येत आहे. याच तत्वावर नागरी स्थानिक संस्थांनी त्यांच्या क्षेत्रामध्ये निर्मल अभियान राबविण्यासाठी कृती आराखडा तयार करावा.

**३. नागरी पाणी पुरवठा :-**

नागरी स्थानिक संस्थानी अधिकृत घरांना खाजगी नळजोडणी, तर सार्वजनिक नळखांबे किंवा इतर माध्यमातून पाणी घेणाऱ्या नागरिकांना खाजगी नळजोडण्या अथवा गट नळजोडण्या उपलब्ध करुन देणे तसेच, अनधिकृत नळजोडण्या शोधून त्या नियमित करण्यासाठी विशेष मोहिम खालीलप्रमाणे राबवावी :-

**अ) अधिकृत घरांना नळजोडण्या उपलब्ध करुन देणे.**

(i) नागरी भागामध्ये नागरीकांना सध्या पिण्याचा पाणी पुरवठा हा खाजगी नळजोडण्या, सार्वजनिक नळखांबे अथवा गट नळजोडण्या याद्वारे करण्यात येतो. शहरामध्ये एकूण मालमत्ता लक्षात घेता, दिलेल्या खाजगी नळजोडण्यांचे प्रमाण कमी असून मोठया प्रमाणावर नागरिकांना सार्वजनिक नळखांबे अथवा गट नळ

जोडण्या तसेच, इतर माध्यमातून पिण्याचे पाणी उपलब्ध करुन घ्यावे लागते. त्यादृष्टीने नागरी स्थानिक संस्थांनी अधिकृत घरांना खाजगी नळजोडणी उपलब्ध करुन देण्यासाठी विशेष मोहिम हाती घ्यावी. त्याअंतर्गत पहिल्या टप्प्यात ज्या ठिकाणी अस्तित्वातील वितरण वाहिन्यामधून योग्य व्यासाच्या पाईप लाईनद्वारे व जागेतून नळजोडण्या देणे शक्य आहे, अशा सर्व अधिकृत घरांना खाजगी नळजोडण्या देण्यात याव्यात.

(ii) ज्या अधिकृत घरांना उपलब्ध वितरण व्यवस्थेतून खाजगी नळजोडण्या देण्यासाठी योग्य व्यासाची पाईप व अंतर्गत वाहिनी टाकण्याची किंवा सुधारण्याची आवश्यकता आहे व त्यास काही कालवधी लागणार आहे अशा अधिकृत घरांना दुसऱ्या टप्प्यात खाजगी नळजोडण्या देण्यात याव्या. अशा प्रकरणांसाठी नागरी स्थानिक संस्था लाभार्थ्याकडून सर्वसाधारण नळजोडणी शुल्का सोबतच विशेष नळजोडणी शुल्क देखील आकारु शकतील.

**ब) अनधिकृत नळजोडण्या शोधून नियमित करण्याची मोहिम राबविणे.**

(i) नागरिकांनी पाणी पुरवठा वितरण वाहिनीमधून अनधिकृतरित्या घेतलेल्या नळजोडण्यांसाठी नागरी स्थानिक संस्थानी अनधिकृत नळजोडण्या शोधून त्या नियमित करण्यासाठी विशेष मोहिम राबवावी. त्या मोहिमेंतर्गत ज्या घरामध्ये अथवा झोपडपट्टी भागामध्ये अनधिकृत नळजोडण्या असतील, अशा अनधिकृत नळजोडण्या अधिकृत करण्यासाठी (पिण्याच्या पाण्याची नळजोडणी नियमित करण्याच्या मोहिमेअंतर्गत ) नागरिकांना ठराविक कालावधीत अर्ज करण्याचे आवाहन करण्यात यावे.

(ii) अनधिकृत नळजोडण्या नियमित करण्याची मोहिम राबविण्याचे जाहिर करताना त्यासाठी अर्ज करण्यासाठी विहित कालावधी घोषित करुन नळजोडणीचा प्रकार तसेच वर्गवारीनुसार अनधिकृत नळजोडण्या नियमित करण्यासाठी आकारावयाचे सवलतीचे नियमितीकरण शुल्क व नळजोडणी शुल्क देखील जाहीर करण्यात यावे.

(iii) अनधिकृत नळजोडण्या नियमित करण्यासाठीची मोहिम ठराविक कालावधीसाठी राबविल्यानंतर नागरिकांकडून अनधिकृत नळजोडण्या नियमित करण्यासाठी अर्ज प्राप्त झाल्यास काही कालवधीसाठी या मोहिमेस मुदतवाढ देता येवू शकेल. परंतू यासाठी त्यांना वरीलप्रमाणे नमुद नियमितीकरण शुल्काव्यतिरिक्त दंडनीय शुल्क आकारुन त्या नियमित करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

(iv) अनधिकृत नळजोडण्या नियमित करण्याच्या मोहिमेनंतर संबंधित नागरी स्थानिक संस्थांद्वारे ग्राहक सर्वेक्षण करण्यात येईल व त्यामध्ये अनधिकृत नळजोडण्या आढळल्यास त्या तात्काळ खंडीत करुन संबंधिता विरुध्द आवश्यक ती कायदेशीर कारवाई करण्यात येईल असेसुध्दा जाहिर आवाहनाच्या पत्रकात

नमुद करण्यात यावे. यासाठी आवश्यक प्रचार व प्रसिध्दी नागरी स्थानिक संस्थांकडून करण्यात यावी. यामध्ये सेवाभावी संस्था , अशासकीय संस्था व महिला बचत गटांनाही सहभागी करुन घेण्यात यावे.

(v) अनधिकृत नळजोडणी असलेल्या नागरीकांकडून नळजोडणी नियमित करण्यासाठी अर्ज प्राप्त करुन घेतल्यावर नागरी स्थानिक संस्थेने जल अभियंता व त्यांच्या अधिनस्त तांत्रिक अधिकारी/कर्मचारी, अनुज्ञप्तीधारक प्लंबर तसेच, गरज भासल्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या क्षेत्रिय कार्यालयातील अभियंताच्या सहाय्याने अनधिकृत नळजोडण्या नियमित करण्यासाठी प्राप्त अर्जाच्या संदर्भात या अनधिकृत नळजोडण्या योग्य व्यासाच्या, योग्य पाईप लाईनमधून तसेच योग्य जागेतून घेतल्या आहेत काय याची शहानिशा करण्यासाठी नळजोडण्याची तपासणी करावी.

(vi) ज्या नळजोडण्या योग्य व्यासाच्या, योग्य पाईप लाईनमधून तसेच योग्य जागेतून घेतल्या आहेत, त्या पहिल्या टप्प्यात नियमित करण्याचे नियोजन करण्यात यावे. तर ज्या अनधिकृत नळजोडण्या अयोग्य पाईप लाईन मधून घेतल्या आहेत, त्या योग्य पाईप लाईन, व्यासाच्या पाईपद्वारे व योग्य पध्दतीने दुसऱ्या टप्प्यात अधिकृत करुन देण्याची पध्दत स्विकारावी.

(vii) अनधिकृत नळजोडण्या नियमित करण्यासाठी सवलतीचे नियमितीकरण शुल्क व नळजोडणी शुल्क ठरवितांना ज्या अनधिकृत नळजोडण्या योग्य व्यासाच्या, योग्य पाईप लाईनमधून तसेच योग्य जागेतून घेतल्या आहेत त्यासाठी व ज्या अनधिकृत नळजोडण्या अयोग्य पाईप लाईन मधून घेतल्या आहेत तिथे योग्य पाईपलाईन टाकावी लागणार आहे त्यासाठी, परिच्छेद ३ (अ) (ii) प्रमाणे वेगवेगळे नियमितीकरण शुल्क व विशेष नळजोडणी शुल्क आकारण्यात यावे.

(viii) अनधिकृत नळजोडण्या नियमित करताना घरधारकांनी जेंव्हापासून अनधिकृतपणे पाणी घेतले आहे, त्या स्वमुल्यांकीत केलेल्या कालवधीपासून सरासरी नुसार शुल्क आकारण्यात यावे.

(ix) खाजगी नळजोडण्यांच्या नावाखाली व्यवसायीक किंवा संस्थात्मक कामासाठी पिण्याच्या पाण्याचा वापर करण्यात येत असल्यास, अशाप्रकारच्या नळजोडण्यांचे पुनवर्गीकरण करुन त्यांना व्यवसायीक किंवा संस्थात्मक दरानुसार देयके आकारणी करुन त्या नळजोडण्या नियमित करण्याबाबत निर्णय घेण्यात यावा.

(x) अनधिकृत नळजोडण्या नियमित करणे किंवा घरापर्यंत खाजगी नळजोडण्या देण्यासाठी येणारा खर्च लाभार्थीकडून घेण्यात यावा किंवा स्थानिक परिस्थितीनुसार अधिकृत नळजोडण्या घेण्यासाठी प्रोत्साहन मिळावे यासाठी काही अंशी सवलत देण्याचा अथवा हा खर्च सुलभ हप्त्यामध्ये पाणी देयकामध्ये समाविष्ट करुन वसूल करण्याबाबत नागरी स्थानिक संस्थानी निर्णय घ्यावा.

(xi) नागरिकांना अनधिकृत नळजोडण्या नियमित करण्यासाठी अर्ज स्विकारण्याची व शुल्क भरण्याची व्यवस्था शहरातील विविध भागात करण्यात यावी. तसेच या मोहिमेबाबत नागरीकांना अधिक माहिती आवश्यक असल्यास ती सुध्दा माहिती केंद्रामधून उपलब्ध करुन देण्यात यावी.

(xii) नागरिकांनी पाण्याची देयके विहित कालावधीत भरल्यास देयकामध्ये काही प्रमाणात सवलत देता येईल, तर, पाणी देयके उशीरा भरल्यास विलंबशुल्क आकारता येईल. मात्र याबाबतचा निर्णय नागरी स्थानिक संस्थांनी घ्यावा. नागरिकांना पिण्याच्या पाण्याची देयके भरणे सुलभ व्हावे यासाठी खाजगी संस्था, अशासकीय संस्था, सेवाभावी संस्था किंवा महिला बचतगट इत्यादींना सहभागी करुन घेऊन पाणी देयके वेळच्यावेळी भरुन वसुलीमध्ये कार्यक्षमता आणण्याचा नागरी स्थानिक संस्थांनी प्रयत्न करावा.

(xiii) पिण्याच्या पाण्याची देयके भरण्यासाठी एकच ठिकाण न ठेवता बँकांच्या मदतीने विविध ठिकाणी अशी सुविधा उपलब्ध करुन देण्यात यावी. पिण्याच्या पाण्याची देयके ही संगणकीकृत असावी व त्यावर जाहिरातीची मुभा देऊन यातून महसूल प्राप्त करुन घेऊन काही प्रमाणात संगणकीकृत बिलांचा खर्च भागविण्यात यावा.

नागरी स्थानिक संस्थानी वरीलप्रमाणे अनधिकृत नळजोडण्या नियमित करण्याची मोहिम राबवावी.

**क) सर्व सार्वजनिक नळथांब्यांचे खाजगी/गट नळजोडण्यामध्ये रुपांतरण करणे.**

शहरातील विविध भागामध्ये विशेषतः झोपडपट्टी भागात सार्वजनिक नळखांब्याव्दारे पाणीपुरवठा करण्यात येतो. परंतु असे निदर्शनास येते की, बऱ्याचवेळा या सार्वजनिक नळखांब्यांचे व्यवस्थापन योग्यप्रकारे होत नाही. त्यामुळे या नळथांब्यातून पाणी वाहात जाऊन पाण्याचा अपव्यय तर होतोच, परंतु आजूबाजूचा परिसर अस्वच्छ होऊन सांडपाण्यामुळे पाणी दुषित होऊन आरोग्यास अपायकारक ठरते. महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्ताने महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत असल्याने याअंतर्गत सर्व अधिकृत घरधारकांना नळजोडणी देणे, तसेच, संरक्षित झोपडपट्टी धारकांना गट नळजोडण्या देण्याचे धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. त्या दृष्टीने खालील तीन पर्यायांचा अवलंब नागरी संस्थांना करता येईल.

**(i) संरक्षित झोपडपट्टी धारकांना पिण्याचे पाणी पुरवठा करण्यासाठी खाजगी नळजोडण्या देणे :**

झोपडपट्टी क्षेत्रामध्ये सार्वजनिक नळथांब्याचे रुपांतरण गट नळजोडण्यामध्ये करताना संरक्षित झोपडपट्टीधारकांनी वैयक्तिक नळजोडणीची मागणी केल्यास अशा प्रकारची नळजोडणी देता येईल. (संरक्षित झोपडपट्टीधारक याचा अर्थ शासनाच्या प्रचलित धोरणानुसार पुनर्वसनासाठी पात्र, झोपडपट्टीधारक)

**(ii) संरक्षित झोपडपट्टी धारकांच्या संस्था/कुटुंबांना गट नळजोडण्या देणे (ग्रुप वॉटर कनेक्शन) :**

१. नागरी स्थानिक संस्थांनी शहरातील सार्वजनिक नळ थांब्यांचे सर्वक्षण करुन त्यांची ठिकाणे व सद्यःस्थितीची माहिती घ्यावी. या सार्वजनिक नळखांब्यातून दुषित व सांडपाण्यामुळे नागरीकांना आरोग्यविषयक समस्या निर्माण होऊ शकतात. सबब, काही संरक्षित झोपडपट्टीधारक कुटुंबांनी एकत्रितपणे गट नळजोडण्या घेण्याबाबत सेवाभावी संस्था व बचत गटाच्या माध्यमातून जागरुकता निर्माण करावी.

२. गट नळजोडणी देण्यासाठी आजूबाजूच्या संरक्षित झोपडपट्टीधारक कुटुंबियांचा एक गट तयार करुन एका कुटुंबधारकाच्या/ त्यांच्या संस्थेच्या नांवे गट नळजोडणी देण्यात यावी व त्याच्या नांवे नागरी स्थानिक संस्थांनी पाणीपट्टीचे देयक द्यावे. गट नळजोडणीव्दारे पाणी घेणाऱ्या आजूबाजूच्या संरक्षित झोपडपट्टीधारक कुटुंबियांनी आपला आर्थिक सहभाग जमा करुन या पाणी देयकाची रक्कम अदा करावी.

३. संरक्षित झोपडपट्टी भागामध्ये गट नळजोडणी देणे व अशा गट नळजोडणी धारकांना पाण्याची देयके देणे, त्यांची वसुली करणे हे काम नागरी स्थानिक संस्था स्वतःच्या कर्मचाऱ्यांमार्फत करुन शकेल किंवा सेवाभावी संस्था, अशासकीय संस्था, महिला बचतगट इ.च्या सहभागाने सुध्दा गट नळजोडण्यांचे आर्थिक व भौतिक व्यवस्थापन करण्याची मुभा देता येईल.

**(iii) झोपडपट्ट्यांमध्ये पाणी पुरवठा करण्यासाठी सार्वजनिक पाणी केंद्र (वॉटर बुथ) उभारणे :**

झोपडपट्टी भागामध्ये नागरिकांना पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्यासाठी नागरी स्थानिक संस्थाद्वारे सार्वजनिक पाणी केंद्रे (पब्लिक वॉटर बुथ) स्थापित करण्यात यावी. या अंतर्गत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

१. सार्वजनिक पाणी पुरवठा केंद्राची उभारणी करण्याची जबाबदारी नागरी स्थानिक संस्थांची राहील.

२. झोपडपट्टी भागामध्ये जमिनसमांतर पाण्यासाठी छोटी टाकी बांधून नागरी स्थानिक संस्थेच्या पाणी पुरवठा योजनेतून त्या टाकीमध्ये जोडणी देण्यात यावी.

३. या जमिनीवरील पाण्याच्या टाकीस काही आवश्यक नळ जोडण्यात यावे.

४. या सार्वजनिक पाणी केंद्राचे व्यवस्थापन स्थानिक नागरी संस्थांचे कर्मचाऱ्यांमार्फत अथवा अशासकीय संस्था, महिला बचतगट इ. व्दारे करण्यात यावे.

५. या पाणी पुरवठा केंद्रातून नागरीकांना पाणी पुरवठा करण्याची जबाबदारी व्यवस्थापन करणाऱ्या संबंधित संस्थेची राहील.

६. या पाणी पुरवठा केंद्राचे व्यवस्थापन करणाऱ्या संस्थांनी झोपडपट्टी धारकांना मासिक अथवा त्रैमासिक शुल्क आकारुन कुटुंब प्रमुखाचे छायाचित्र असलेले प्रिपेड कार्ड द्यावेत.

७. झोपडपट्टी क्षेत्रात न राहणाऱ्या इतर नागरिकांनाही सार्वजनिक पाणी पुरवठा केंद्रातून पिण्याचे पाणी घेण्याची मुभा राहील. परंतु यासाठी प्रिपेड कार्डधारक कुटुंबधारकापेक्षा अधिक दराने शुल्क आकारण्यात यावे.

८. पाणी पुरवठा केंद्राचे व्यवस्थापन सेवाभावी संस्थांना देणे, पाण्याचे दर निश्चित करणे, व्यवस्थापन करणाऱ्या संस्थेची जबाबदारी निश्चित करणे तसेच याची कार्यप्रणाली विहित करणे इ.जबाबदारी नागरी स्थानिक संस्थेची राहील.

**ड)** (i) नागरी स्थानिक संस्थांनी खाजगी नळजोडण्या अथवा गट नळजोडण्यावर टप्प्या टप्प्याने जलमापके (मीटर) बसविण्याची कार्यवाही करावी. एका ठराविक कालावधीत विशेष मानकाचे विहित केलेले जलमापके बसविण्याबाबत नागरीकांना सुचित करण्यात यावे. अथवा नागरी संस्थांनी नळधारकांना जलमापके बसवून देऊन त्यापोटीचा खर्च पाणी देयकातून सुलभ हप्त्याने वसूल करण्यात यावा. अशा पध्दतीने मीटर बसविताना त्याच्या देखभाल व दुरुस्तीची तरतुदही ठराविक कालावधीसाठी करण्यात यावी.

(ii) सर्व अधिकृत घरांना नळजोडण्या उपलब्ध करुन देणे व सार्वजनिक नळथांब्यांचे रुपांतरण गटजोडण्यांमध्ये करुन देण्याचे धोरण स्विकारताना अस्तित्वातील योजनेतील पिण्याच्या पाण्यासाठी होणारा वापर व हिशोबबाहय पाण्याचे प्रमाण काढावे. या हिशोबबाहय पाण्याचे प्रमाण पाणी गळती, पाणी चोरी, पाण्याचा अपव्यय इ.बाबीवर आळा घातल्यास १५ ते २० टक्के पर्यंत कमी करुन पाण्याची बचत होऊन अतिरिक्त खाजगी नळ जोडण्या अथवा गट नळजोडण्या धारकांना पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देणे शक्य होऊ शकते व यामुळे नागरी संस्थांच्या उत्पन्नात वाढही होऊ शकते. याचाच एक भाग म्हणून नागरी संस्थानी शहरातील विविध बांधकामासाठी प्रक्रिया केलेले पिण्याचे पाणी न वापरता अशा कामासाठी अप्रक्रियाकृत (रॉ वॉटर अथवा इतर माध्यमातून) पाणी उपलब्ध करुन देण्यात यावे. सार्वजनिक नळथांब्यांचे गट नळजोडण्यामध्ये रुपांतरण केल्याने पाण्याचा अपव्यय व परिसरात अस्वच्छता तर होणार नाही, त्याचबरोबर नागरी संस्थांना पिण्याच्या पाण्याचे शुल्काचे माध्यमातून महसुल प्राप्त होऊन योजनेच्या देखभाल व दुरुस्तीमध्ये स्वयंपूर्णता व कार्यक्षमता आणण्यासाठी मदत होऊ शकेल.

(iii) नागरी स्थानिक संस्थांनी शहरातील नागरिकांना पिण्याचे पाणी योग्य पध्दतीने वापर करण्याबाबत जनजागृती करण्यात यावी त्यासाठी खालील बाबीवर लक्ष देण्यात यावे :-

- प्रक्रिया केलेले पिण्याचे पाणी बगीचा, वाहन धुणे, रोड धुणे, बांधकाम इ.साठी नागरीकांनी वापरू नये.
- नागरिकांनी आवश्यक असेल तेवढयाच पिण्याच्या पाण्याचा साठा करावा व त्या पाण्याचा पूर्ण वापर करावा. साठवून ठेवलेले पाणी फेकून देऊन, परत साठवून ठेवण्याच्या सवयीमध्ये बदल करावा, असेही आवाहन करण्यात यावे.
- जलवाहिनीवर टुल्लू पंप बसवून पाणी खेचून घेण्याबाबत प्रतिबंध करण्यात यावा व असे केल्याचे आढळल्यास त्यांचेवर दंडात्मक कारवाई करण्यात यावी.

स्थानिक नागरी संस्थांनी वरीलप्रमाणे सार्वजनिक नळ थांब्यांचे रुपांतरण गट नळ जोडण्यामध्ये करण्याची कार्यवाही पूर्ण करावी.

**४. नागरी स्वच्छता :-**

(i) नागरी भागामध्ये वैयक्तिक शौचालय व सार्वजनिक शौचालयाचे बांधकामासाठी केंद्र पुरस्कृत व राज्य शासनाच्या सहभागातून कमी खर्चाचा वैयक्तिक शौचालय बांधकाम कार्यक्रम व सार्वजनिक शौचालय बांधकाम कार्यक्रमातंर्गत शौचालयाचे बांधकाम करण्यात आले आहे. त्याचबरोबर नागरी स्थानिक संस्था, सेवाभावी व अशासकीय संस्थाच्या माध्यमातूनसुध्दा सार्वजनिक शौचालयाचे बांधकाम करण्यात आलेले आहे. तरीपण वैयक्तिक व सार्वजनिक शौचालयाची उपलब्धता कमी आहे. त्याचबरोबर सार्वजनिक शौचालयाची देखभालसुध्दा कार्यक्षमणे करणे आवश्यक आहे. परंतु शौचालयाचे व्यवस्थापन योग्यप्रकारे होत नसल्याने नागरिकांकडून त्याचा वापर होत नाही असेही दिसून येते. शौचालय बांधण्याची व वापरण्याची अनास्था, अपर्याप्त उपलब्धता तसेच अपर्याप्त देखभाल व अयोग्य व्यवस्थापन यामुळे उघडयावर शौचविधी करण्याची पध्दत बहूतांश शहरांमध्ये दिसून येते.

महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त शासनाने महाराष्ट्र राज्य निर्मल करण्याचा निर्णय घेलेलेला आहे. यादृष्टीने नागरी स्थानिक संस्थानी वैयक्तिक व सार्वजनिक शौचालय बांधकाम व त्यांचे व्यवस्थापन करुन उघडयावर शौचविधी करण्यापासून शहर मुक्त करण्याचा आराखडा तयार करावा. त्याअनुषंगाने वैयक्तिक व सार्वजनिक शौचालयांसाठी नागरी स्थानिक संस्थानी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१. केंद्र पुरस्कृत कमी खर्चाच्या स्वच्छता कार्यक्रमातर्गत दारिद्रय रेषेखालील नागरीकांसाठी शौचालय बांधकामासाठी आवश्यक सर्वेक्षण करुन प्रस्ताव शासनास सादर करावा.

२. केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय नागरी स्वच्छता धोरणानुसार (National Urban Sanitation Policy) नागरी स्थानिक संस्थांनी शहराच्या विविध भागात वैयक्तिक व सार्वजनिक शौचालयाची उपलब्धता, व त्याची सद्यस्थिती याबाबत सर्वेक्षण करुन शहर स्वच्छता आराखडा तयार करावा.

३. ज्या नागरीकांक्डे वैयक्तिक शौचालय नाही अशाना निश्चित कालावधीत वैयक्तिक शौचालय बांधण्यासाठी उद्युक्त करावे.

४. वैयक्तिक शौचालय बांधण्यासाठी नागरीकांना प्रोत्साहन म्हणून ठराविक कालावधीसाठी काही सवलत देण्याचा विचार नागरी स्थानिक संस्थांनी करावा.

५. नागरिकांकडे असलेल्या वैयक्तिक शौचालय तसेच सार्वजनिक शौचालयातील मलाचा उपसा नियमित करण्यासाठी नागरी संस्थांनी उपसकाची (डिस्लजींग संच) व्यवस्था करावी अथवा करार पध्दतीने खाजगी संस्थेकडून ही व्यवस्था उपलब्ध करुन नागरीकांना त्यांच्या मागणीनुसार उपलब्ध करुन द्यावी. यासाठी आवश्यक शुल्क नागरिकांकडून घेण्यात यावे.

६. शौचालयाचे महत्व व आवश्यकता याबाबत सेवाभावी संस्था व महिला बचत गटाद्वारे नागरिकांमध्ये जागरुकता निर्माण करावी. यानंतरही वैयक्तिक शौचालय बांधण्यात आले नाही तर अशा कुंटुंबीयांनी किमान सार्वजनिक शौचालयाचा वापर करावा व उघडयावर शौचविधीस जाऊ नये याबाबत सूचित करण्यात यावे.

७. वैयक्तिक शौचालय बांधण्याबाबत नागरी स्थानिक संस्थांनी नागरिकांना आवाहन केल्यानंतरही वैयक्तिक शौचालय न बांधता किंवा सार्वजनिक शौचालयाचा वापर न करता उघडयावर शौचविधीस जाण्याची पध्दत अवलंबिणाऱ्या व्यक्तीवर नागरी स्थानिक संस्था यांनी कायद्याप्रमाणे दंडात्मक कार्यवाही करण्यात यावी. यासाठी उपविधी तयार करुन त्याअंतर्गत नागरिकांना वैयक्तिक शौचालय बांधणे अथवा सार्वजनिक शौचालयाचा वापर करणे बंधनकारक करावे व उघडयावर शौचविधीस ठराविक कालावधीनंतर प्रतिबंधित व दंडनीय घोषित करण्यात यावे.

८. नागरीकांना वैयक्तिक शौचालय बांधण्यासाठी शक्य असल्यास नागरी स्थानिक संस्थानी स्वत: किंवा बँकांच्या मदतीने नागरिकांना कर्ज उपलब्ध करुन देण्याबाबत विचार करण्यात यावा. ज्याची परतफेड लाभार्थी नागरीकांक्डून समान हप्त्यामध्ये मालमत्ता करासोबत करण्याची तरतूद करता येईल.

९. शहरातील दाट लोकवस्तीच्या भागामध्ये नागरीकांना वैयक्तिक शौचालय बांधण्यासाठी जागा उपलब्ध होणे अवघड असल्यास अशा परिस्थितीत सार्वजनिक शौचालये/स्वच्छतागृहे बांधण्यासाठी नागरी स्थानिक संस्थेने पुढाकार घ्यावा.

१०. सार्वजनिक शौचालयाचे बांधकाम करतांना त्यामध्ये महिलांसाठी आवश्यक शौचालयाची तरतूद करण्यात यावी. तर लहान मुले, अंपग व्यक्ती तसेच वृध्दासांठी देखील विशेष प्रकारच्या शौचालयाची तरतूद करण्यात यावी.

११. शहरातील सार्वजनिक महत्वाच्या जागा, मार्केट जागा, आठवडी बाजार, बस आगार, रेल्वे स्थानक व शासकीय कार्यालयाजवळ आवश्यक सार्वजनिक शौचालये उपलब्ध असणे व त्याची देखभाल नियमित होणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने नागरी संस्थांनी शौचालयाची उपलब्धता व व्यवस्थापनाची व्यवस्था करावी. अशा सार्वजनिक स्थळावर सार्वजनिक शौचालय बांधणे व त्याचे व्यवस्थापन करण्यासाठी कार्यरत सेवाभावी संस्थांना शौचालयाच्या बांधकामासाठी जागा व सुविधा उपलब्ध करुन दिल्यास शौचालय बांधणे व त्याचे व्यवस्थापन त्याच्याकडून करता येईल. त्यादृष्टीने नागरी संस्थांनी आवश्यक विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन अंमलबजावणी करावी. सार्वजनिक खाजगी सहभागाने सार्वजनिक शौचालयाचे बांधकाम व व्यवस्थापन करायचे असल्यास एकुण बांधकाम क्षेत्राच्या १५% वाणिज्यीक वापरासाठी उपलब्ध करणे व त्या भागाचा वापर जाहिरातीसाठी करण्यासाठी देता येवू शकेल. मात्र त्याकरिता आवश्यक वाहनतळाची सुविधा (Parking Facklity) प्रस्तावित करण्यात यावी. सबब याबाबतच्या सूचना शासनाच्या नगर विकास विभागामार्फत निर्गमित करण्यात येतील.

१२. नागरी संस्थेने एका विशेष माहिमेअंतर्गत अस्तित्वातील नादुरुस्त सार्वजनिक शौचालयाची दुरुस्ती करुन तेथे पाणी व दिवाबत्तीची व्यवस्था करावी. तसेच शौचालय काळजीवाहकाची व्यवस्था करावी जेणेकरुन शौचालयाची देखभाल व व्यवस्थापन होईल. यासाठी सेवाभावी संस्था, अशासकीय संस्था तसेच महिला बचत गटांना अशा सार्वजनिक शौचालयाच्या व्यवस्थापनाची जबाबदारी देता येईल. किंवा जे कुंटुब शौचलयाचा वापर करतात त्यांनी काळजीवाहक नेमून व्यवस्थापनाची काळजी घ्यावी.

१३. नागरी स्थानिक संस्थांनी शहरातील शाळा,विद्यालये,दवाखाने, विविध केंद्र व राज्य शासकीय आणि निमशासकीय कार्यालयामध्ये स्वच्छतागृहांची उपलब्धता व व्यवस्थापनाबाबत संबधिताशी समन्वय करुन या सेवांबाबत पाठपुरावा करावा.तसेच शहरामध्ये असलेले कारखाने, उद्योग, वाणिज्यिक संस्था इत्यादीमार्फतसुध्दा सार्वजनिक शौचलयाचे बांधकाम व व्यवस्थापन करण्यासाठी नागरी संस्थानी विशेष प्रयत्न करावेत.

१४. संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानातंर्गत वैयक्तिक व सार्वजनिक शौचालयाची पर्याप्त उपलब्धता, व्यवस्थापन तसेच शहर उघडयावर शौचविधी पासुन मुक्त करण्यासाठी नागरी संस्थाकडून केलेल्या प्रयत्नावर विशेष भर राहील. त्यादृष्टीने नागरी संस्थांनी या बाबतीत जाणीवपूर्वक प्रयत्न करावेत.

१५. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाद्वारे निर्मल महानगर प्रदेश अभियान राबविण्यात येत आहे याच तत्वावर महानगरपालिकांनी व काही नगरपालिकांमध्ये निर्मल अभियान राबविण्यासाठी कृती आराखडा तयार करणे. निर्मल महानगर प्रदेश अभियानांतर्गत ज्या ठिकाणी कायमस्वरुपी शौचालये/स्वच्छतागृहांचे बांधकाम करण्यासाठी जमीन उपलब्ध नाही, अशा ठिकाणी उघडयावर

शौचविधी करण्याचा प्रथेचे उच्चाटन करण्यासाठी फिरती शौचालये किंवा तात्पूरत्या स्वरुपाची शौचालय सेवाभावी संस्थांच्या माध्यमातून पुरविण्यासाठी अनुदान सेवाभावी संस्थांना मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेले आहे. याचप्रमाणे नागरी स्थानिक संस्था या सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी अशा प्रकारचे अभियान राबवू शकतील.

ii) राज्यातील नागरी भागामध्ये वैयक्तिक व सार्वजनिक शौचालयाची उपलब्धता वाढवून व कार्यक्षम व्यवस्थापन करुन महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त महाराष्ट्र राज्य निर्मल करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत केलेले आहे. त्यानुसार राज्य शासनाच्या प्रशासकीय कार्यालयांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी :-

१. शासनाच्या विविध प्रशासकीय विभागाद्वारे त्याचे अधिनस्त राज्यातील विविध शहरांमध्ये असलेल्या क्षेत्रिय कार्यालये व यंत्रणामध्ये शौचालयाची पर्याप्त उपलब्धता व कार्यक्षम व्यवस्थापनासाठी आवश्यक ती तरतूद करुन अंमलबजावणीसाठी क्षेत्रिय कार्यालये व यंत्रणाना सूचना देण्यात याव्यात. याबाबत संदर्भाकीत दि.२३ फेब्रुवारी २०१० च्या शासन परिपत्रकानुसार सर्व प्रशासकीय विभागाना यापूर्वीच सूचना देण्यात आलेल्या आहेत.

२. सार्वजनिक बांधकाम विभागाने याबाबत समन्वय करुन शासकीय इमारतीसाठी स्वच्छता कृती आराखडा तयार करुन अमंलबजावणी करावी.

३. महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाने राज्यातील सर्व बस स्थानकामध्ये पर्याप्त महिला व पुरुष स्वच्छतागृह बांधण्यासाठी व त्याची देखभाल कार्यक्षमपणे करण्यासाठी कृती आराखडा तयार करुन अमंलबजावणी करावी.

४. सार्वजनिक आरोग्य विभाग व वैद्यकिय शिक्षण विभाग यांनी सर्व नागरी/ग्रामीण रुग्णालये, सार्वजनिक आरोग्य केंद्र, जिल्हा रुग्णालये, वैद्यकिय महाविद्यालय, वैद्यकिय प्रयोगशाळा इत्यादी ठिकाणी महिला व पुरुष स्वच्छतागृहांची पर्याप्त उपलब्धता व व्यवस्थापनासाठी आवश्यक तरतूद व संनियंत्रण करावे.

५. शालेय शिक्षण विभाग तसेच उच्च व तंत्र शिक्षण विभागाने राज्यातील शासकीय विद्यालये, महाविद्यालये, विद्यापीठ, प्राथमिक व उच्च माध्यमीक शाळा, प्रशासकीय इमारतीमध्ये महिला व पुरुष स्वच्छतागृहांची पर्याप्त उपलब्धता व व्यवस्थापनासाठी आवश्यक तरतूद व संनियंत्रण करावे.तसेच खाजगी शाळा, विद्यालये इत्यादीमध्ये या आवश्यक सुविधा उपलब्ध असण्यासाठी आवश्यक सूचना द्याव्यात.

६. सामाजिक न्याय विभाग व आदिवासी विभागानी त्यांच्या अधिनस्त असलेल्या वसतीगृह, आश्रमशाळा व इतर प्रशासकीय यंत्रणामध्ये स्वच्छतागृहाची पर्याप्त उपलब्धता व व्यवस्थापनासाठी आवश्यक तरतूद व संनियंत्रण करण्यात यावे.

**५. समन्वय व संनियंत्रण**

महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त शासनाने महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्याचा निर्णय घेतलेला आहे. त्याअंतर्गत नागरी भागातील अधिकृत घरांमध्ये नळजोडणी व शौचालय उपलब्ध करुन तसेच संरक्षित झोपडपट्टी भागामध्ये गट नळजोडण्या किंवा सार्वजनिक पाणी केंद्राव्दारे पाणी पुरवठा व सार्वजनिक शौचालय उपलब्ध करुन महाराष्ट्र राज्य सुजल व निर्मल करावयाचे आहे. त्या अनुषंगाने, वरीलप्रमाणे सूचविलेल्या उपाययोजनांचे जिल्हास्तरावर समन्वय व संनियत्रण करण्यासाठी जिल्हास्तरीय समिती स्थापन करण्यात येत आहे.

अ) जिल्हास्तरीय सुजल व निर्मल समितीची रचना व कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| १. **जिल्हाधिकारी** | - | **अध्यक्ष** |
| २. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - | सदस्य |
| ३. जिल्हा पोलिस अधिक्षक यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ४.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग | - | सदस्य |
| ५. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | - | सदस्य |
| ६. नगपालिकांचे मुख्याधिकारी | - | सदस्य |
| ७. **जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगरपरिषद प्रशासन** | - | **सदस्य सचिव** |

वर नमुद केल्याप्रमाणे जिल्हास्तरावरील समितीच्या बैठकीसाठी जिल्हयातील शासकीय कार्यालयाच्या विभाग प्रमुखांना सुध्दा आमंत्रित करु शकतील. शहरांच्या लगतच्या काही गावामध्ये शहरी योजनातून पाणी पुरवठा होत असल्यास अशा प्रकल्पासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद यांना समितीमध्ये अंतर्भूत केलेले आहे. जिल्हास्तरीय सुजल व निर्मल समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१) जिल्हयातील सर्व नागरी स्थानिक संस्थाद्वारे अधिकृत घरांना खाजगी नळजोडणी किंवा गट नळजोडण्या उपलब्ध करुन देण्यासाठी कालबध्द मोहिमेचे समन्वय व संनियंत्रण करणे.

२) नागरी संस्थाव्दारे अनधिकृत नळजोडण्या शोधून त्या नियमित करण्याच्या कार्यवाहीचा पाठपुरावा करणे तसेच याबाबत काही अडचणी असल्यास समन्वय करणे.

३) नागरी संस्थानी शहर स्वच्छता आराखडे तयार करुन त्याची अंमलबजावणी करण्यासाठी समन्वय करणे.

४) नागरी भागातील अधिकृत घरासांठी वैयक्तिक तसेच सार्वजनिक शौचालयाची उपलब्धता वाढविण्यासाठी नागरी संस्थांना मार्गदर्शन करणे

५) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाद्वारे निर्मल महानगर प्रदेश अभियान राबविण्यात येत आहे याच तत्वावर महानगरपालिका व नगरपालिकांमध्ये निर्मल अभियान राबविण्यासाठी कृती आराखडा तयार करणे.

६) वरील सर्व कार्यक्रमासाठी नागरी स्थानिक संस्थेने त्यांच्या अंदाजपत्रकात आवश्यक तरतूद करण्याची खातरजमा करणे.

७) वरील सर्व बांबीचा अंतर्भाव जिल्हाधिकारी यांच्या स्तरावर नगरपरिषदाच्या घेण्यात येत असलेल्या मासिक आढाव्याच्या विवरणात करुन आढावा घेण्यात यावा.

जिल्हाधिकारी यांनी वरील कालबध्द मोहिमेचा त्रैमासिक अहवाल आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय यांचेकडे पाठवावा.यासाठी विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त, नगरपरिषद प्रशासन, यांनी विभागातील सर्व जिल्हयांकडून हे त्रैमासिक अहवाल प्राप्त करुन आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई यांचेकडे पाठविण्यासाठी समन्वय करावा.

ब) त्याचप्रमाणे राज्यातील महानगरपालिका क्षेत्रामध्ये उक्त उपाययोजनांचे समन्वय व संनियंत्रण करण्याकरिता महानगरपालिका आयुक्त यांचे अध्यक्षतेखाली महानगरपालिकास्तरीय समिती स्थापन करण्यात येत आहे. या महानगरपालिकास्तरीय सुजल व निर्मल समितीची रचना खालीलप्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| **१. महानगरपालिका आयुक्त** | **--** | **अध्यक्ष** |
| २. महानगरपालिकेचे शहर अभियंता | -- | सदस्य |
| ३. महानगरपालिकेचे मुख्य आरोग्य अधिकारी | -- | सदस्य |
| ४. पोलिस आयुक्त / पोलिस अधीक्षक यांचे प्रतिनिधी | -- | सदस्य |
| ५. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग | -- | सदस्य |
| ६. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | -- | सदस्य |
| **७. उपायुक्त, महानगरपालिका (पाणी पुरवठा व स्वच्छता विषय हाताळणारे)** | **--** | **सदस्य सचिव** |

महानगरपालिकास्तरीय सुजल व निर्मल समितीची कार्यकक्षा जिल्हास्तरीय समितीप्रमाणेच राहील.

६. आयुक्त, महानगरपालिका यांनी महानगरपालिकास्तरीय समितीकडून अहवाल प्राप्त झाल्यानंतर स्वयंः मुल्यमापनासह सर्वकंष अहवाल संदर्भाकीत दि.२२ ऑक्टोंबर २००८ च्या शासन निर्णयानुसार स्थापन केलेल्या महाराष्ट्र राज्य सुजल व निर्मल अभियानाच्या संनियत्रंणासाठी स्थापन केलेल्या राज्यस्तरीय समितीस सादर करण्यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई यांचेकडे पाठवावा. जिल्हास्तरीय सुजल

व निर्मल समिती तसेच, महानगरपालिकास्तरीय सुजल व निर्मल समिती यांचेकडून त्यांचे त्रैमासिक अहवाल प्राप्त करून आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई यांनी प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग तसेच सचिव (२) नगर विकास विभाग यांचेकडे पाठवावे. सदर अहवाल राज्यस्तरीय समितीस सादर करण्यात येतील.

७. सदर शासन निर्णय हा नगर विकास विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. संकीर्ण२०१०/१८/नवि२० आणि अनौपचारीक संदर्भ क्र. २६६/१०/१३ अनुसार प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक **संकेतांक २०१००६१९६२३०४००१ असा आहे.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**सही/-**
**( मालिनी शंकर )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव
४. सर्व मा.विधीमंडळ सदस्य,
५. महापौर,सर्व महानगरपालिका
६. महालेखापाल-१ मुंबई
७. महालेखापाल-२ नागपूर
८. विभागीय आयुक्त ( सर्व ) महसूली विभाग
९. आयुक्त, सर्व महानगरपालिका
१०. पोलीस आयुक्त ( सर्व )
११. जिल्हाधिकारी ( सर्व )
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा
१३. जिल्हा पोलीस अधिक्षक, सर्व जिल्हे
१४. अध्यक्ष, सर्व नगरपरिषदा.
१५. आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई
१६. संचालक, लेखाकोषागार, मुंबई.
१७. उपआयुक्त, नगरपालिका प्रशासन कक्ष, विभागीय आयुक्त ( सर्व ) महसूली विभाग
१८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई
१९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (सर्व)
२०. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ( सर्व )
२१. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (सर्व)
२२. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ( सर्व )

२३. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (सर्व)
२४.कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ( सर्व )
२५. मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका
२६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२७.सर्व जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालये ( सर्व जिल्हे )
२८. सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगरपरिषद प्रशासन , जिल्हाधिकारी कार्यालये ( सर्व जिल्हे)
२९. सर्व मंत्रालयीन विभाग , मंत्रालय, मुंबई.
३०. सर्व सहसचिव/ उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी , पा.पु.व स्व.वि.,मंत्रालय,मुंबई
३१. निवडनस्ती पापु-२२